**शासनाच्या अधिपत्याखालील वरिष्ठ शासकीय संस्थांमधील अध्यापकीय पदे प्रतिनियुक्तीने भरणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३१/टिएनटी-१**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ३२.
दिनांक :- १० मार्च, २०१७.

**वाचा -**

१) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१७७/१६/प्रशा-५, दिनांक १९.११.२०१६.

**प्रस्तावना -**

मा. मुख्यमंत्री महोदयांनी राज्यास गुणवत्तेच्या दृष्टीने राष्ट्रीय पातळीवर प्रथम तीन क्रमांकामध्ये आणण्याचे उदिष्ठ दिले आहे. त्यास अनुसरुन दि. २२.६.२०१५ रोजी प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र संदर्भात शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. सदर उद्दिष्ठ गाठण्यासाठी सशक्त शैक्षणिक सक्षमीकरण व्यवस्था तयार करण्याच्या दृष्टीने अनुभवी व पात्र असे मनुष्यबळ आवश्यक त्या प्रमाणात संबंधित शैक्षणिक संस्थेस उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. या हेतूने राज्यातील खाजगी अनुदानित संस्थेतील शिक्षकांना शालेय शिक्षण विभागाच्या राज्यस्तरीय व सर्व क्षेत्रीय कार्यालयामध्ये समकक्ष विविध अध्यापकीय स्वरुपाच्या पदावर “लीन” ची सवलत देऊन प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याकरिता संदर्भाधीन शासन निर्णय दि.१९.११.२०१६ अन्वये आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. तथापि प्रतिनियुक्तीने शिक्षक उपलब्ध करुन देताना अनुसरण्यात येणारी कार्यपध्दत, रिक्त जागी शिक्षण सेवक म्हणून सदर पद तात्पुरत्या स्वरुपात भरण्यास देण्याची परवानगी, वेतन व भत्ते अदा करण्याबाबत निश्चित करावयाची जबाबदारी तसेच कामकाजविषयक अन्य सेवाशर्ती याबाबत स्पष्टीकरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -** शासनाच्या अधिपत्याखालील शालेय शिक्षण विभागाअंतर्गत वरिष्ठ शासकीय संस्थांमधील अध्यापकीय पदे खाजगी अनुदानित शाळेतील शिक्षकांमधून प्रतिनियुक्तीने भरताना पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी :-

१) खाजगी अनुदानित संस्थेतील शिक्षकाची प्रतिनियुक्तीसाठी निवड समितीमार्फत निवड करताना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी,स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व

सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ यातील तरतूदी फेरफारानुसार लागू राहतील. त्यानुसार एखाद्या शिक्षकास प्रतिनियुक्ती दयावयाची असल्यास ती प्रथमत: ५ वर्षाकरिता देण्यात येईल.

२) प्रतिनियुक्तीने नियुक्ती झाल्यानंतर संबंधित पदाची कर्तव्ये व जबाबदारी त्यास पार पाडणे आवश्यक राहील.

३) प्रतिनियुक्तीने नियुक्त कर्मचाऱ्याचे वेतन संबंधित आस्थापनेकडून (प्रतिनियुक्ती झालेल्या) अदा करण्यात येईल.

४) प्रतिनियुक्ती नियुक्त कर्मचारी त्याच्या मूळ आस्थापनेवरील सेवेत धारण केलेल्या पदाचा कार्यभार हाती घेतो, त्या तारखे पासून तो मूळ सेवेत आल्याचे मानण्यात येईल. मात्र प्रतिनियुक्तीवर असताना सेवा समाप्ती वेळेस त्याने निवृत्तीपूर्व रजा घेतली तर, तो रजेवर जाईल त्या तारखेपासून तो मूळ आस्थापनेवरील सेवेत परत आल्याचे मानण्यात येईल.

५) प्रतिनियुक्तीवर गेलेल्या कर्मचाऱ्यांची सेवाजेष्ठता मूळ आस्थापनेवर अबाधित राहील. तसेच प्रतिनियुक्तीवरील सेवा कालावधी हा मूळ सेवाजेष्ठतेकरिता विचारात घेण्यात येईल.

६) रिक्त झालेले पद किमान ५ वर्षाकरिता असल्याने शिक्षकाचे पद शिक्षण सेवक म्हणून तात्पुरत्या स्वरुपात भरताना ६ महिने कालावधीपर्यंत कंत्राटी स्वरुपात भरण्याबाबत शासन निर्णय दि २७.६.२०१६ अन्वये विहीत करण्यात आलेली तरतूद, प्रतिनियुक्तीने रिक्त झालेले पद भरताना लागू असणार नाही.

७) प्रतिनियुक्तीमुळे रिक्त होणारे शिक्षकाचे पद त्याच प्रवर्गातून संबंधित शैक्षणिक संस्थेने महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी ( सेवेच्या शर्ती ) नियमावली, १९८१ मधील तरतूदीनुसार तसेच याबाबत शासनाने वेळोवेळी परित केलेल्या शासन निर्णयातील सूचनानुसार विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करुन भरण्यात यावे.

८) तात्पुरत्या स्वरुपात नियुक्त शिक्षण सेवकाचा ३ वर्षाचा विहित कालावधी पूर्ण झाल्यास, सदर शिक्षण सेवकास शिक्षकाची नियमित वेतनश्रेणी देय ठरेल व अशा शिक्षकाच्या जागी प्रतिनियुक्तीवर गेलेला मूळ शिक्षक परत आला तर, त्याचे पदावर तात्पुरत्या स्वरुपात नियुक्त केलेल्या शिक्षकाला अतिरिक्त ठरवून त्यास अन्य शाळेमध्ये रिक्त पदावर महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी ( सेवेच्या शर्ती ) नियमावली, १९८१ मधील तरतूदीनुसार समायोजन करण्यात यावे.

महाराष्ट्र खाजगी शाळेतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मध्ये स्वतंत्रपणे करण्यात येणाऱ्या सुधारणेच्या अटीच्या अधीन राहून हा शासन आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१५१४४४४७७०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Dattatray Mane

Digitally signed by Sanjay Dattatray Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5938dfcf55dfa4d20c3c2b25ee54999d774aedb59d71b14cfc2860776279ef16, serialNumber=cc816238ed3c914e2fa2e99da4bc0ba4e1f6947aa23ad145e3dc6a469041090f, cn=Sanjay Dattatray Mane
Date: 2017.03.15 14:46:10 +05'30'

**( सं. द. माने )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. संचालक, (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. संचालक, (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण, पुणे.
५. विभागीय शिक्षण उपसंचालक (सर्व)
६. सर्व शिक्षणाधिकारी, (माध्यमिक व उच्च माध्यमिक/ प्राथमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. निवड नस्ती, टिएनटी-१.